**मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना दि महाराष्ट्र स्टेट को-ऑप. हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशनने दिलेल्या कर्जाच्या शासन हमी परताव्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गृहनि-२०१३/प्र.क्र.११६/अजाक-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २४ मार्च, २०१५

वाचा

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक:- बीसीएच-१०९६/प्र.क्र.३५८/ मावक-२, दिनांक १.४.१९९८
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक:- बीसीएच-२००८/ प्र.क्र.१९७(भाग-२)/मावक-२(अजाक-१), दिनांक ९.१.२०१३
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक:- बीसीएच-२००८/ प्र.क्र.११६/अजाक-१ दिनांक १२ मार्च, २०१४

प्रस्तावना

मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना अर्थसहाय्य (पीडब्लूआर २१९) या योजनेअंतर्गत मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांमधील आर्थिकदृष्ट्या दुर्बल गट व अल्प उत्पन्न गटातील उत्पन्नाची मर्यादा धारण करणा-या सदस्यांना घर बांधणीसाठी शासनातर्फे अनुदान दिले जाते. या योजनेंतर्गत मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना कर्ज मंजूर व अदा करावयाची जबाबदारी दि महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि.मुंबई यांचेकडे सोपविण्यात आली होती. ज्या मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्था, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि.मुंबई या संस्थेकडून कर्ज घेणार असतील, त्यांच्या कर्जाला, बांधकाम खर्चाच्या मर्यादेच्या अधीन राहून विविध शासन निर्णयान्वये शासन हमी दिलेली आहे.

त्यानुषंगाने दि महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि.,मुंबई यांनी मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना अर्थसहाय्य (पीडब्लूआर २१९) या योजनेंतर्गत मागासवर्गीय सहकारी गृहनिर्माण संस्थांना वितरित केलेल्या कर्जाच्या हमी परताव्यापोटी मुद्दल व व्याज असे एकुण रुपये ३१. ८९ कोटी महामंडळास अदा करण्यास संदर्भाधीन क्र.२ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार अनुसूचित जातीचे सदस्य असलेल्या एकूण १०३ संस्थांच्या रु. १०.२८ कोटी रक्कमेपैकी सन २०१२-१३ या आर्थिक वर्षात रु. १.१७ कोटी निधी वितरित करण्यात आला आहे.

सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात रु. ६.४३ कोटी व रु. ०.६० कोटी अशाप्रकारे रु. ७.०३ कोटी इतकी रक्कम अदा करण्यात आली आहे.आता दि महाराष्ट्र स्टेट को-ऑप.हाऊसिंग फायनान्स कॉर्पोरेशन लि,मुंबई याना सद्यस्थितीत रु. २.०८ कोटी इतकी रक्कम देणे बाकी आहे. सदरील रक्कम अदा करण्याबाबत ची बाब शासन स्तरावरुन विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात या योजनेसाठी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली रु. ३५०.०० लक्ष पैकी ७५% च्या मर्यादेच्या आत म्हणजेच रु. २.०८ कोटी इतकी रक्कम लेखाशीर्ष ६२१६-०२३९ या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन या द्वारे मान्यता देत आहे.

२. प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अदा करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यांस देण्यात येत आहेत.

३. यावर होणारा खर्च पुढील नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक एन- ५**

६२१६ गृहनिर्माण साठी कर्जे

८०, सर्वसाधारण

८००, इतर कर्ज

(०१) सहकारी गृहनिर्माण संस्थाना दिलेल्या कर्जाच्या शासनहमी परताव्याबाबत

(६२१६ ०२३९ )

५५ कर्जे व अग्रीमे

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १७८/व्यय १५, दिनांक १६/२/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२४१६०१३१०६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2015.03.24 16:12:05 +05'30'

**( सिध्दार्थ अ.झाल्टे )**

**अवर सचिव**

**प्रत,**

१. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
४. व्यवस्थापकीय संचालक,दि महाराष्ट्र स्टेट कॉ ऑप हाऊसिंग फायनान्स कार्पोरेशन लि. मुंबई
५. आयुक्त, सहकार व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेय / लेखा परीक्षा ) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
९. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
१०.सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
११.जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था,
१२.वित्त विभाग (अर्थोपाय/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती- अजाक-१